**<u>ॲड. श्री. सी.अर्यमा सुंदरम, विशेष समुपदेशी यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत....</u>**
**मा. महानगर न्यायदंडाधिकारी,बांद्रा, मुंबई यांचेकडे दाखल तक्रार क्र. ३१४/एस डब्लू/२०१३ मधून उद्भवलेल्या मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल रिट याचिका (क्रिमिनल) क्र. ३२६/२०२१ या न्याय प्रकरणी कामकाजासाठी.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी-०८२१/प्र.क्र.१९०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २६ एप्रिल, २०२२.

<u>संदर्भ</u> :- **१.** शासन पत्र, विधि व न्याय विभाग क्र. ४५/१५३६/एसपीपी/२०२१/अ' शाखा, दि. २७.८.२१
**२.** शासन निर्णय,वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.२९.७.२०१५
**३.** शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.१६.६.२०१७

**शासन निर्णय :-**

मा. महानगर न्यायदंडाधिकारी,बांद्रा, मुंबई यांचेकडे दाखल तक्रार क्र. ३१४/एस डब्लू/२०१३ मधून उद्भवलेल्या मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल रिट याचिका (क्रिमिनल) क्र. ३२६/२०२१ या न्याय प्रकरणी शासनाच्या वतीने बाजू मांडण्यासाठी विशेष समुपदेशी म्हणून नियुक्त करण्यात संदर्भ क्र.१ अन्वये नियुक्त ज्येष्ठ विधिज्ञ ॲड. श्री. सी. अर्यमा सुंदरम यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली**

प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.८,२५,०००/- (रुपये आठ लाख पंचवीस हजार फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. श्री. सी. अर्यमा सुंदरम यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. जेष्ठ विधिज्ञ श्री. सी. अर्यमा सुंदरम यांना व्यावसायिक फीचे प्रदान करण्यासाठी येणारा खर्च मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस -(००)१०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७)- २८ व्यायसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

३. जेष्ठ विधिज्ञ श्री. सी. अर्यमा सुंदरम यांना व्यावसायिक फीचे प्रदान करण्यासाठी कोषागारातून निधी आहरीत करण्यास्तव, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे कार्यालयातील मागणी क्र. बी-१, २०५५

पोलीस -(००)१०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७)- २८ व्यायसायिक व विशेष सेवा हे लेखाशिर्ष हाताळणारे संबंधित नियंत्रक अधिकारी आणि अहरण व संवितरण अधिकारी यांनी यथोचित कार्यवाही करावी.

४. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त घ्यावी.

५. हा शासन निर्णय उपरोक्त संदर्भाधीन २ व ३ येथील नमूद वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०५०२१६१२१२१९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VENKATESH BHAT

Digitally signed by VENKATESH BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, pseudonym=4BD2A00BD54D7705C239CA2A5785A87EDE4514EC, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH BHAT
Date: 2022.05.02 16:13:51 +05'30'

**(व्यंकटेश भट)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, मुंबई.
३. पोलीस सह आयुक्त (गुन्हे), मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. ॲड.श्री. सी. अर्यमा सुंदरम,१३८, जोर बाग, नवी दिल्ली-११० ००३.
८. विधि व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई.
९. वित्त विभाग (विनिमय), मंत्रालय,मुंबई.
१०. निवड नस्ती/पोल-१०.